**विमानचालन संचालनालय, मुंबईच्या आस्थापनेवरील मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर) /मुख्य वैमानिक (विमान), व वैमानिक यांच्या वेतनामध्ये सुधारणा करणे आणि वैमानिकाचे पद सह वैमानिक या पदामध्ये अवनत करुन सदर पदासाठी वेतनमान निश्चितकरणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय: एव्हीएन १००९/प्र.क्र.६८१/२००९/२८-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३१ मार्च, २०१०

वाचा: १)शासन निर्णय क्र. : एव्हीएन १००१/प्र.क्र.५१/२००१/२८-अ
दिनांक: ११ ऑगस्ट, २००६
२)शासन निर्णय क्र. : एव्हीएन १००२/प्र.क्र.४६/२००२/२८-अ
दिनांक: २८ मार्च, २००३
३)शासन निर्णय क्र. : एव्हीएन १००८/प्र.क्र.६२१/०८/२८-अ
दिनांक: ३० ऑगस्ट, २००८
४)विमान चालन संचालनालयाचे पत्र क्र. डीए/एडीएम/१२९२/०९
दिनांक: १६ ऑक्टोबर, २००९

**प्रस्तावना :-** विमानचालन संचालनालय, मुंबईच्या आस्थापनेवर संदर्भाधीन शासन निर्णय दि.११ ऑगस्ट, २००६ अन्वये मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर), मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक ही पदे मंजूर आहेत. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम २००९ नुसार सहाव्या वेतन आयोगाच्या सुधारित वेतन संरचनेप्रमाणे विमान चालन संचालनालयाअंतर्गत मुख्य वैमानिक, अतिरिक्त मुख्य वैमानिक, वरिष्ट कॅप्टन, कॅप्टन हेलिकॉप्टर या पदासांठी रु. ३७४००-६७००० अधिक ग्रेड वेतन रु. ८,९००/- ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे.

१.१ उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली असली तरीही हवाई वाहतूक क्षेत्रातील वैमानिक संवर्गातील स्पर्धात्मक वेतनश्रेणी/वेतनमान विचारात घेता, सदर वेतनश्रेणीमध्ये विहीत अर्हताधारक वैमानिक मिळणे कठीण होत आहे. सबब विमानचालन संचालनायलयाच्या आस्थापनेवरील मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर), मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक या पदांच्या वेतनश्रेणीमध्ये सुधारणा करण्याचा तसेच शासकीय विमानासाठी सह

वैमानिक या पदाची आवश्यकता असल्याने वैमानिकाचे एक पद सह वैमानिक या पदामध्ये अवनत करुन सदर पदाचे वेतनमान इत्यादी निश्चित करण्याचा प्रस्ताव विमान चालन संचालनालयाच्या विविध समस्यांवर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या दि.४ जानेवारी, २०१० रोजी आयोजित करण्यात आलेल्या बैठकीमध्ये मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. शक्ती प्रदत्त समितीने शिफारस केल्याप्रमाणे विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर मंजूर असलेल्या मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर), मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक या पदांसाठी तसेच विमान संचालनालयाच्या गरजेप्रमाणे वैमानिकाचे एक पद सह वैमानिक या पदामध्ये अवनत करुन सदर पदासाठी सुधारित वेतनमान व इतर अनुज्ञेय सुविधा मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

२. विमान संचालनालय, मुंबईच्या आस्थापनेवरील मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर), मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक या पदांच्या वेतनश्रेणीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याबाबत तसेच शासकीय विमानासाठी सह वैमानिक या पदाची आवश्यकता असल्याने वैमानिकाचे एक पद सह वैमानिक या पदामध्ये अवनत करुन सदर पदासाठी खाली नमुद केल्याप्रमाणे वेतनमान आणि अन्य सुविधां मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

**(अ) मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर/विमान):**

(१) दरमहा वेतन रु.२.०० लक्ष + ५% वार्षिक वेतनवाढ
(२) शासकीय निवासस्थान
(३) शासकीय वाहन
(४) दूरध्वनी (L.L./Interet/Moblie)
(५) महाराष्ट्र नागरी सेवा नियमाप्रमाणे रजा व अनुज्ञेय सुविधा
(६) राज्य शासन नियमानुसार दैनिक भत्ता / प्रवास भत्ता व अनुज्ञेय सुविधा
(७) लॉस ऑफ लायसन्स, विमा व वैयक्तिक अपघात
(८) रिन्युअल ऑफ लायसन्स व अनिवार्य चेक्सवरील खर्च
(९) रजा प्रवास सवलत (अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असल्याप्रमाणे)

**(ब) वैमानिक (हेलिकॉप्टर/विमान)**

(१) दरमहा वेतन रु.१.५० लक्ष + ५% वार्षिक वाढ
(२) कायालयीन कामासाठी वाहन
(३) दूरध्वनी (L.L./Interet/Moblie)

(४) महाराष्ट्र नागरी सेवा नियमाप्रमाणे रजा व अनुज्ञेय सुविधा
(५) राज्य शासन नियमानुसार दैनिक भत्ता / प्रवास भत्ता व अनुज्ञेय सुविधा
(६) लॉस ऑफ लायसन्स, विमा व वैयक्तिक अपघात
(७) रिन्युअल ऑफ लायसन्स व अनिवार्य चेक्सवरील खर्च
(८) रजा प्रवास सवलत (अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असल्याप्रमाणे)

**(क) सहवैमानिक:**

(१) दरमहा वेतन रु.१.२५ लक्ष + ५% वार्षिक वाढ
(२) कायालयीन कामासाठी वाहन
(३) दूरध्वनी (L.L./Interet/Moblie)
(४) महाराष्ट्र नागरी सेवा नियमाप्रमाणे रजा व अनुज्ञेय सुविधा
(५) राज्य शासन नियमानुसार दैनिक भत्ता / प्रवास भत्ता व अनुज्ञेय सुविधा
(६) लॉस ऑफ लायसन्स, विमा व वैयक्तिक अपघात
(७) रिन्युअल ऑफ लायसन्स व अनिवार्य चेक्सवरील खर्च
(८) रजा प्रवास सवलत (अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असल्याप्रमाणे)

३. विमान चालन संचालयनालयाच्या गरजेप्रमाणे वैमानिकाचे पद सह वैमानिक या पदामध्ये अवनत करण्याबाबतचे अधिकार सचिव (विमान चालन), सामान्य प्रशासन विभाग यांना राहतील.

४. हे आदेश विमान चालन संचालनालयाच्या विविध समस्यांवर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या शिफारशीनुसार तसेच, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६५/सेवा-९, दि. २२ फेब्रुवारी, २०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३३१११८५३४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अं.बि.अंभिरे

**(अं. बि. अंभिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) सचिव (विमान चालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. मुख्य सचिव यांचे सचिव,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा), मुंबई
९) उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमान चालन) (कार्यासन २५), मंत्रालय. मुंबई
१०) संचालक, विमानचालन संचालनालय, हॅगर क्र. ६, जुहू विमानतळ, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३) निवड नस्ती कार्यासन २८-अ